**व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्यासाठीच्या कार्यपद्धतीमधील व्यवसाय अभ्यासक्रम शिकविणाऱ्या संस्थांच्या तुकडयांमधील प्रवेशक्षमतेशी संबंधित तरतूद क्र.१०.२ सन २०२१-२२ या एक वर्षाच्या कालावधीसाठी शिथील करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : व्हिओसी-२०२२/प्र.क्र.३४/कौशल्य-२**

दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ एप्रिल, २०२२

**संदर्भ:-** (१) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक व्हिओसी-२०१७/प्र.क्र.१५७/व्यशि-४, दिनांक १० मे, २०१८.

(२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्र.०८/व्हिओसी/प्रवेश/२०२२/२३१, दिनांक २५ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :**

पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्दिलक्षी तसेच उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नविन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विना अनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यांस परवानगी देण्यासाठीच्या ऑनलाईन प्रमाणित कार्यपध्दतीस विभागाच्या संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये, मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील प्रपत्र अ मधील प्रमाणित कार्यपध्दतीमधील अनु. क्र. (१०) येथील “संस्थेची गुणवत्ता व सुधार प्रणाली” अंतर्गत खालीलप्रमाणे तरतूद आहे :-

**१०.१.** शासनाने मान्यता दिलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमाचा दर्जा व गुणवत्ता उच्च प्रतीचा राखण्याच्या दृष्टीने संचालनालय स्तरावरुन नियमितपणे प्रवेशित विद्यार्थ्यांची प्रशिक्षण गुणवत्ता तपासण्यासाठी प्रत्येक वर्षी ७५ टक्के पेक्षा कमी निकाल असणाऱ्या संस्थेचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्यात येईल. एखाद्या संस्थेचा निकाल सतत ३ वर्षामध्ये ७५ टक्के पेक्षा कमी असल्यास सदर संस्थेची मान्यता रद्द करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

**१०.२.** शासनाने मान्यता दिलेल्या अभ्यासक्रमाच्या तुकडीत सतत ३ वर्ष मंजूर प्रवेशक्षमतेच्या ५० टक्के पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर संस्थेची मान्यता आपोआप रद्द होईल.

२. राज्यातील व्यवसाय अभ्यासक्रम शिकविणाऱ्या अशासकीय अनुदानित संस्थेमध्ये सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षात कोरोना प्रादुर्भावामुळे द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या प्रवेश क्षमतेच्या ५० टक्यापेक्षा कमी झाली. त्यामुळे संदर्भाधीन क्र.(१) येथील शासन निर्णयातील “प्रपत्र-अ” मधील प्रमाणित कार्यपध्दतीमधील मुद्दा क्र.१० मध्ये नमूद अटीनुसार संस्थेवर संबंधित व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालयामार्फत कार्यवाही करण्यात येते.

संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयातील "प्रपत्र-अ" मधील प्रमाणित कार्यपध्दतीमधील अनु. क्र.१०.२ मधील तरतूद शिथील करण्याबाबतची निवेदने व कोवीड कालावधीत कमी प्रवेश व उपस्थिती या वर्षी विचारात या मान्यता रद्द करण्यात येऊ नयेत, अशा मागण्यां या विभागास प्राप्त झाल्या आहेत. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र. (२) अन्वये प्राप्त झालेल्या संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयातील "प्रपत्र-अ" मधील प्रमाणित कार्यपध्दतीमधील अनु. क्र. १०.२ मधील तरतूद सन २०२१-२२ यावर्षासाठी शिथील करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्दिलक्षी तसेच उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नविन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विना अनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यांस परवानगी देण्यासाठीच्या ऑनलाईन प्रमाणित कार्यपध्दतीस संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील "प्रपत्र-अ" मधील प्रमाणित कार्यपध्दतीमधील अनु. क्र.१०.२ येथील तरतूद व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या संस्थांसाठी सन २०२१ -२२ या एक वर्षाच्या कालावधीकरिता शिथील करण्यास मान्यता देण्यात येत आहे. कोवीड कालावधीत विद्यार्थ्यांचे कमी प्रवेश झाले असल्याची बाब विचारात घेऊन मान्यता रद्द करण्याची कार्यवाही सन २०२१-२२ या वर्षामध्ये करण्यात येऊ नये व केली असल्यास ती रद्द करण्यात यावी.

२. सन २०२२-२३ मध्ये ज्या संस्थामध्ये प्रवेश क्षमतेच्या ५० टक्केपेक्षा कमी प्रवेश होतील त्यांच्यावर संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामध्ये दिलेल्या अटीनुसार कार्यवाही करण्यात यावी. अशी कार्यवाही करताना सन २०१८-१९ व सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षातील प्रवेश ५० टक्क्यांपेक्षा कमी झाले असतील ते ग्राह्य धरून संस्थेवर कार्यवाही करण्यात यावी.

३. व्यवसाय अभ्यासक्रमातील विषयामध्ये शासनाने राष्ट्रीय कौशल्य पात्रता आराखडा (National Skill Qualification Framework) नुसार अभ्यासक्रमांत बदल केल्यास त्याप्रमाणे अभ्यासक्रम राबविणे संस्थेवर बंधनकारक राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२२०४२७१५४०२६४३०३** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9,
pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8,
serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A,
cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2022.04.27 15:41:57 +05'30'

**( प्रदीप सा.शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा. राज्यमंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) प्रधान सचिव, कौशल्य , रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहायक.

४) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहायक.

५) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई

६) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण , प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)

७) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी. (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)

८) निवडनस्ती - कौशल्य-२.